संगमनेर तालुका, जिल्हा अहमदनगर येथील ६२ तलाठी व ९ मंडळ कार्यालये तथा निवासस्थाने बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीएलडी-३३१४/प्र.क्र.८२/ई-८,**

३२ वा मजला, सेंटर -१ इमारत,जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: १९ ऑगस्ट, २०१४.

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक- बीएलडी-३३११/प्र. क्र. २६३/ई-८, दिनांक १८/११/२०११.

२) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. साप्रशा/कार्या/रवका/१४३/२०१४, दि. ०३/०४/२०१४.

३) दिनांक २४/०७/२०१४ रोजी झालेल्या शासकीय इमारतीच्या बांधकामांना मंजुरी देण्याबाबतच्या सचिव समितीचे बैठकीचे कार्यवृत्त.

**शासन निर्णय:-**

संगमनेर, जिल्हा अहमदनगर येथे ६२ तलाठी व ९ मंडळ कार्यालये तथा निवासस्थाने बांधकामासाठी संद्सर्भाधीन दिनांक १८/११/२०११ च्या शासन निर्णयान्वये रुपये १२,००,००,०००/- ( अक्षरी रुपये बारा कोटी फक्त ) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकांस व नकाशास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली होती. आता जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी संदर्भाधीन दिनांक ०३/०४/२०१४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार विषयांकीत बांधकामासाठी येणाऱ्या रु. १५,९२,७६,६५६/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी ब्याण्णव लक्ष शहात्तर हजार सहाशे छप्पन्न फक्त) इतक्या रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकांच्या वाढीबाबत सर्वसाधारण तपासणी करता खालील बाबी आढळून आल्या आहेत.-

१) जास्त दराची निविदा स्विकारल्यामुळे सदर निविदा ४.९० टक्के आधिक्य दराची स्विकारण्यात आली असल्याने अंदाजपत्रकीय किंमतीमध्ये वाढ झाली आहे.

२) क्षेत्रफळात झालेली वाढ मूळ अंदाजपत्रक हे नकाशाप्रमाणे तलाठी कार्यालय ८०.११५ चौ. मी. व मंडळ कार्यालय ८०.११५ चौ. मी. क्षेत्रफळासाठी करण्यात आले होते. तथापि उपभोक्त्या खात्याच्या मागणीनुसार उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, औरंगाबाद यांनी मंजूर केलेल्या नकाशाप्रमाणे

तलाठी कार्यालय १०७.६० चौ. मी. व मंडळ कार्यालय १०७.६० चौ.मी. नुसार प्रत्यक्षात काम करण्यात आले आहे. त्यामुळे अंदाजपत्रकीय किमतीमध्ये वाढ झाली आहे.

३) उपभोक्त्या खात्याच्या मागणीप्रमाणे खालील बाबी पूर्ण करण्यासाठी अंदाजपत्रकात वाढ झाली आहे.-

१) इमारतीस कोटा फरशीऐवजी व्हेट्रीफाईड टाईल्स बसविणे.
२) इमारतीस फ्लश दरवाजे ऐवजी लॅमिनेटेड दरवाजे बसविणे.
३) इमारतीच्या छतावर गळती प्रतिबंधक योजनांसाठी केमिकल वॉटर प्रुफिंग ऐवजी ब्रिक बॅट पद्धतीचे वॉटर प्रुफिंग करणे.
४) छतावर जाण्यासाठी लोखंडी शिडी बसविणे.
५) कार्यालयासाठी फर्निचर, टेबल व खुर्ची घेणे.
६) इमारतीचे इलेक्ट्रिफिकेशन करणे.

४) बाबनिहाय झालेली वाढ व त्याची टक्केवारी खाली नमूद केल्याप्रमाणे आहे.-

| बाब | मूळ प्र. मा. किंमत | सुधारीत किंमत | आधिक्य | बचत | टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|
| मुळ काम | ९,३८,५४,७२२.५० | १३,५०,९२,७९४.०० | ४,१२,३८,०७२ | - | ४३.९३% |
| आकस्मिक खर्च | ३७,५४,१८८.९० | ०.०० | ०.०० | ३७,५४,१८८.९० | (-) १००% |
| विद्युतीकरण | १,०३,२४,०१९.४८ | ७६,८९,४७३.०० | ०.०० | २६,३४,५४६.४८ | (-) २५.५१% |
| पाणीपुरवठा व मलनिस्सारण | ७५,०८,३७७.८० | ०.०० | ०.०० | ७५,०८,३७७.८० | (-) १००% |
| लेबर इन्शुरन्स | ९,३८,५४७.२३ | ०.०० | ०.०० | ९,३८,५४७.२३ | (-) १००% |
| व्हॅट | ७,०३,९१०.४२ | ०.०० | ०.०० | ७,०३,९१०.४२ | (-) १००% |
| फर्निचर | २८,३५,२३३.६८ | २८,३५,२३४.०० | ०.०० | ०.०० | ०.००% |
| भाववाढ | ०.०० | ७४,१४,७०५.०० | ७४,१४,७०५.०० | ०.०० | १००% |
| निविदा आधिक्य | ०.०० | ५७,४४,४५०.०० | ५७,४४,४५०.०० | ०.०० | १००% |
| रेन वॉटर हार्वेस्टिंग | ०.०० | ५,००,०००.०० | ५,००,०००.०० | ०.०० | १००% |
| **एकूण** | **११,९९,१९,०००.००** | **१५,९२,७६,६५६.००** | **५,४८,९७,२२७.००** | **१,५५,३९,५७१.००** | |
| **निव्वळ आधिक्य ३,९३,५७,६५६.०० ( ४१.९३ टक्के )** | | | | | |

५) सुधारीत अंदाजपत्रकांची सर्वसाधारण तपासणी करता खालील बाबी आढळून आल्या.-

१. अंदाजपत्रक सहायक अभियंता श्रेणी १, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, संगमनेर यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम

विभाग, संगमनेर, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर तसेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी साक्षांकित केले आहे.

२. सदर कामासाठी उप मुख्यवास्तुशास्त्रज्ञ, औरंगाबाद यांनी तयार केलेल्या आराखड्याचा वापर करण्यात आलेला आहे.

३. सुधारित अंदाजपत्रक सन २०११-१२ च्या दरसूचीवर आधारीत आहे.

६. प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकात वरील प्रमाणे सुधारणा व दुरुस्ती करुन तलाठी व मंडळ कार्यालय तथा निवासस्थान बांधकामाच्या रु. १५,९२,७६,६५६/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी ब्याण्णव लक्ष शहात्तर हजार सहाशे छप्पन्न फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाची सहमती आहे.

७. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना जिल्हा प्रशासन - मागणी क्रमांक एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. मात्र सदरच्या खर्चासाठी अंदाजपत्रकामध्ये तरतुद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये.

८. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच दिनांक २४/०७/२०१४ रोजी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या बैठकीमध्ये आयत्यावेळी उपस्थित झालेल्या कामांच्या यादीतील असून उच्च स्तरीय सचिव समितीने मान्यता दिल्या नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९११३२३०४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.19 13:21:14 +05'30'

**(चं. नि. पाडळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

२. जिल्हाधिकारी, अहमदनगर.

३. प्रधान लेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई-२०.

४. महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई-२०.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा- अहमदनगर.

६. तहसिलदार कार्यालय, संगमनेर, जि. अहमदनगर.

७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इ मा-३), मंत्रालय, मुंबई-३२.

८.नियोजन विभाग, कार्यासन-१४७५, मंत्रालय, मुंबई-३२.

९. वित्त विभाग, व्यय-९ / विनियम, मंत्रालय, मुंबई-३२.

१०.निवड नस्ती, ई-८, महसूल व वन विभाग,कफ परेड, मुंबई-०५.